**भविष्य निर्वाह निधी वर्गणीदारांना संगणक विकत घेण्यासाठी भविष्य निर्वाह निधीमधून रक्कम (ना-परतावा) काढण्यास मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक- भनिनि-२००३/प्र.क्र.४५/२००३/१३-अ,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,

**दिनांक:- ७ जुलै, २००४**

**शासन निर्णय:-**

राज्य शासनाने शासकीय कामकाजामध्ये संगणीकरणाचा वापर करण्याचा निर्णय घेतला असून शासन सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांना संगणक वापराचे ज्ञान असणे आवश्यक केले आहे. शासनाचे सदर धोरण विचारात घेवून महाराष्ट्र राज्य शासकीय अधिकारी / कर्मचारी संघटनेने शासनाकडे केलेल्या मागणीनुसार भविष्य निर्वाह निधी वर्गणीदारांना वैयक्तिक संगणक खरेदी करण्यासाठी भविष्य निर्वाह निधीमधून ( ना-परतावा ) रक्कम काढण्यास परवानगी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन आता असे आदेश देत आहे की, महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियमामधील नियम क्रमांक १६ नुसार वर्गणीदाराच्या सेवेची ५ वर्षे पूर्ण झाल्यानंतर वैयक्तिक संगणक संच खरेदी करण्यासाठी खालील अटींच्या अधिन राहून निधीतून रक्कम काढण्यास परवानगी देण्यात येत आहे:-

१) खरेदी करावयाच्या संगणकाची प्रिंटरसहित प्रत्यक्ष किंमत किंवा वर्गणीदाराच्या खाती जमा निधीच्या तीन चतुर्थांश एवढया रकमेपर्यंत किंवा कमाल रुपये ५०,०००/- (पन्नास हजार फक्त ) यापैकी कमी असलेली रक्कम मंजूर करण्यात यावी.

२) सदर रक्कम शासन सेवेतील संपूर्ण कालावधीत फक्त एकदाच अनुज्ञेय असेल.

३) ज्या वर्गणीदारांनी राज्य शासनाच्या मंजूर अनुदानातून संगणक अग्रिम घेतला आहे, त्यांना संगणक खरेदीसाठी भविष्य निर्वाह निधीतुन अग्रिम देय होणार नाही.

४) वर्गणीदार ज्या पदावर कार्यरत आहे त्या पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार संगणक वापराचे ज्ञान असणे आवश्यक नाही, अशा पदांवरील वर्गणीदारांना संगणक अग्रिम अनुज्ञेय होणार नाही.

२. महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियमामध्ये वरील प्रमाणे सुधारणा करण्याबाबतची अधिसूचना यथावकाश प्रसिध्द करण्यात येईल.

३. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४१४/२००३/सेवा-२,दि. २७/८/०३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(भि.रा.वाळवे.)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,

मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

रोटा प्रिंट/एच-513(5000-7-04)1

(कृ.मा.प.

उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतींसह)
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर (१० जादा प्रतींसह)
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतींसह)
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर ( १० जादा प्रतींसह)
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ न्यायशाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.
वरीष्ठ उप महालेखापाल, भविष्य निर्वाह निधी कक्ष ,
ब्रिजवासी बिल्डींग, सोनवाला रोड, गोरेगांव, मुंबई-४०० ०६३
(५० जादा प्रतींसह)
मुख्य लेखा परीक्षक, निवासी लेखे, कोकण भवन, नवी मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
ग्राम विकास विभाग / नगर विकास विभाग/ वित्त विभाग,(सेवा-२) ,
मंत्रालयाचे इतर सर्व विभाग,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई ( प्रसिध्दी पत्रक काढण्यासाठी)
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेले सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय,मुंबई ( २ प्रती ),
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,.
निवड नस्ती.
* पत्राने

---